महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी
महासंघाने सुरु केलेल्या
"कार्यसंस्कृती अभियान" यशस्वी
करण्यासाठी सहकार्य देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.५४/१८ (र.व का.),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१०.

वाचा :- १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-१०.०२/९८०/२०१०/
१८ (र.व का.), दि.३ सप्टेंबर २००२,
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-१०.०३/६३४/
१८(र.व का.), दि.२७ जून २००३.

परिपत्रक

राज्य शासनाचे अधिकारी/कर्मचारी जनतेचे सेवक आहेत. जनतेची कामे विनासायास व तत्परतेत करणे हे शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांचे कर्तव्य आहे, ही भावना सर्व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांमध्ये बिंबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाकडून कार्यसंस्कृती अभियान यापूर्वी राबविण्यात आले होते. आता देखील महासंघाचा कार्यसंस्कृती अभियान राबविण्याचा संकल्प आहे.

२. (अ) राज्य शासनाच्या अधिकाऱ्यांनी जनतेचे सेवक या नात्याने सामान्य जनतेची कामे विनासायास व तत्परतेने करण्यामध्ये अधिक पुढाकार घ्यावा, राज्यातील सर्व जिल्हयांची मुख्यालये तसेच तालुका पातळीवर अधिकाऱ्यांच्या सभा-बैठका आयोजित करण्यात येणार आहेत.

(ब) अधिकारी महासंघाने सुरु केलेला कार्यसंस्कृती अभियान हा स्तुत्य उपक्रम अधिक यशस्वी होण्यासाठी सर्व विभागांचे सचिव, विभागीय आयुक्त, खातेप्रमुख, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच जिल्हा-तालुका पातळीवरील कार्यालय प्रमुखांनी प्रोत्साहन व सहकार्य देणे गरजेचे आहे.

(क) महासंघाच्या अभियानात सहभागी होण्यासाठी कार्यालयातील अधिकारी कर्मचाऱ्यांना प्रोत्साहीत करणे व विभागनिहाय/जिल्हानिहाय/तालुकानिहाय बैठका-सभा जेव्हा आयोजित करण्यात येतील तेव्हा तेथे उपस्थित राहण्यासाठी राज्य शासकीय कार्यालयातील अधिकाऱ्यांना, कार्यालयीन कामकाजावर विपरित परिणाम न

( कृ.मा.प.)

होण्याच्या अटीवर १ तास कार्यालय लवकर सोडण्यास परवानगी देण्याच्या सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत, मंत्रालयीन विभागातील सचिवांनी आपल्या विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, क्षेत्रीय/जिल्हा/तालुका स्तरावरील कार्यालयाचे कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास वरील सूचना आणून द्याव्यात.

३. सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९२७२१४६०५००१ असा आहे.

( नंदकुमार जंत्रे )
सचिव (प्र.सु.,र.व का.), महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
मा.मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सरचिटणीस, महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ४०००३२,
निवड नस्ती.